**पर्यावरण संतुलीत समृध्द ग्राम योजना या कार्यक्रमांतर्गत जनजागृती कार्यक्रम राबविणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास व जलसंधारण विभाग**
शासन निर्णय क्रमांक व्हिपीएम २०११/प्र.क्र.११० /पंरा-४
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
**दिनांक : २१ सप्टेंबर, २०११**

**वाचाः-** शासन निर्णय क्रमांक व्हिपीएम २६१०/प्र.क्र.१/पंरा-४, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दि.१८ ऑगस्ट,२०१०

**प्रस्तावना :-**

राज्यातील ग्रामीण भागाच्या शाश्वत विकासासाठी ग्रामविकास व जलसंधारण विभागामार्फत पर्यावरण संतुलित समृध्द ग्राम योजना राबविण्यात येत आहे. योजनेचे हे दुसरे वर्ष असून यातील निकषांची आणि झालेल्या कामांची व्यापक प्रसिध्दी करण्याच्या दृष्टीने विविध माध्यमातून प्रसिध्दी करणे आवश्यक आहे. यासाठी माध्यमांची निश्चिती करणे, संकल्पना मागविणे व तपासणे, दरपत्रक मागविणे व निश्चित करणे, संकल्पनाची निश्चिती व सादरीकरणाचा दर्जा तपासणे व त्यास अंतिम मान्यता देऊन वितरण करण्यापर्यंतची कार्यवाही करण्यासाठी या क्षेत्रातील तज्ञ लोकांची समिती स्थापन करण्याचे शासनाच्या विचाराधिन होते.

**शासन निर्णय :-**

पर्यावरण संतुलित समृध्द ग्राम योजना या कार्यक्रमांतर्गत जनजागृती कार्यक्रम, प्रचार प्रसिध्दी व व्यवस्थापन करणेबाबत राज्यस्तरीय व स्थानिक वर्तमानपत्रात जाहिरात करण्यासाठी जाहिरात संस्थाद्वारे योजनेच्या संकल्पना मागविणे आवश्यक आहे. संस्थांनी सादर केलेल्या प्रस्तावाची तांत्रिक व आर्थिक पडताळणी करुन मान्यता देणे तसेच दृक व श्राव्य माध्यमातून प्रचार प्रसिध्दीसाठी रेडीओवरील जिंगल्स, दूरदर्शनवरील जाहिरात, वर्तमानपत्रातील जाहिराती, राज्यस्तर पोस्टर्स, प्रदर्शन, होर्डिंग, प्रचारप्रसिध्दी साहित्य, घडीपत्रिका पुस्तिका, प्रचार प्रसिध्दीसाठी लागणारे साहित्य इत्यादी बाबी उत्कृष्टरित्या व परिणामकारक होण्यासाठी या कामाचे ज्ञान असणाऱ्या तज्ञ व्यक्तींची समिती नेमण्यात येत असून त्याची रचना खालीलप्रमाणे आहे.

| | | |
|---|---|---|
| १. अध्यक्ष | - | सचिव, ग्राम विकास व पंचायती राज |
| २. सदस्य | - | संचालक (प्रशासन), माहिती व जनसंपर्क कार्यालय |

३. सदस्य - संचालक (वृत्त), माहिती व जनसंपर्क कार्यालय

४. सदस्य - उप सचिव (पंचायत राज) ग्रामविकास व जलसंधारण विभाग

५. सदस्य - उप सचिव (वित्त), ग्रामविकास व जलसंधारण विभाग

६. सदस्य - उप संचालक (प्रदर्शन), माहिती व जनसंपर्क कार्यालय

७. सदस्य - वरिष्ठ सहाय्यक संचालक, (वृत्तचित्र शाखा) माहिती व जनसंपर्क कार्यालय

८. सदस्य सचिव - कार्यासन अधिकारी, पं.रा.४

या समितीने माध्यम आराखडयात नमूद केलेली कामे, संकल्पना त्याचा दर्जा व वितरण इथपर्यंत कामे करणेचेआहे.

सदर शासन निर्णय शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणकीय संकेतांक २०११०९२२१६२१५०००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने ,

**(डॉ. मल्लिनाथ कलशेट्टी)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. माननीय राज्यपालांचे सचिव,
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३. मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव,
४. मा.मंत्री व राज्यमंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव,
५. मा.मुख्य सचिव,
६. महालेखापाल, महराष्ट्र-१, मुंबई (लेखा व अनुज्ञेयता),
७. महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर (लेखा व परिक्षा व अनुज्ञेयता),
८. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचलनालय, मंत्रालय, मुंबई (प्रसिध्दीसाठी व माहितीसाठी)
९. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
१०. ग्राम विकास विभागातील सर्व उप सचिव,
११. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
१२. संचालक, भाषा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
१३. ग्राम विकास विभागातील सर्व कार्यासने व रोखशाखा,
१४. निवड नस्ती, कार्यासन पं.रा.-४ (२२), ग्राम विकास व जलसंधारण विभाग